**नियंत्रक, वैध मापन शास्त्र, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांचे आस्थापनेवर मेसर्स क्रिष्णा मोटर्स प्रोव्हायडिंग मॅनपॉवर सर्व्हिस, जोगेश्वरी, मुंबई या कंत्राटदाराकडून बाह्ययंत्रणेद्वारे दोन वाहन चालकांची सेवा उपलब्ध करून घेण्यास मुदतवाढ देणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक: वैमाशा-२०२३/प्र.क्र. ७९/ग्रासं-३**
हुतात्मा राजगुरू चौक, मादाम कामा मार्ग, मुंबई-४०००३२
दि: ३० जून, २०२३

वाचा-: १) अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग शासन निर्णय क्र. संकीर्ण-१०१७/प्र.क्र.१५६/ ना.पु.१२, दिनांक १८ एप्रिल, २०२२
२) अन्न,नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग, शासन निर्णय क्र.वैमाशा-२०२१/प्र.क्र.१५/ ग्रासं-३, दिनांक २७ जूलै, २०२२
३) नियंत्रक, वैध मापन शास्त्र यांचे पत्र क्र.मंपाआ ०९/१५२३/प्र.क्र.१२६/वैमाशा-१/८६१, दि.८ जून,२०२३
४) उदयोग, ऊर्जा व कामगार विभाग, शासन निर्णय क्र.काआआ-२०२३/प्र.क्र.२३३/कामगार-८, दिनांक १४ मार्च, २०२३

प्रस्तावना :-

संदर्भ क्र. १ येथील दिनांक १८ एप्रिल, २०२२ च्या शासन निर्णयान्वये अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभागाच्या अधिनस्त नियंत्रक, वैध मापन शास्त्र, मुंबई या कार्यालयातील पदांचा सुधारित आकृतीबंध निश्चित केला आहे. सदर आकृतीबंधामध्ये वाहन चालकांची एकूण १३ पदे मृत संवर्ग म्हणून घोषित करण्यात आलेली असून सदरची पदे बाह्य यंत्रणेद्वारे भरण्याबाबत मान्यता दिलेली आहे. त्यानुसार संदर्भ २ च्या शासन निर्णयान्वये नियंत्रक, वैध मापन शास्त्र यांच्या आस्थापनेवर दोन वाहन चालकांच्या सेवा कंत्राटी पध्दतीने मे.क्रिष्णा मोटर्स प्रोव्हायडिंग मॅनपॉवर सर्व्हिस, जोगेश्वरी, मुंबई या एजन्सीकडून ११ महिन्यांसाठी उपलब्ध करून घेण्यास मंजूरी दिलेली आहे. शासन निर्णय, उदयोग, ऊर्जा व कामगार विभाग, दिनांक १४ मार्च, २०२३ अन्वये बाह्ययंत्रणेद्वारे मनुष्यबळ उपलब्ध करून घेण्यासाठी सुधारित धोरण निश्चित करण्यात आलेले असून त्यानुसार मनुष्यबळ उपलब्ध करून घेण्याची कार्यवाही करण्यात येत आहे. सदर सुधारित धोरणानुसार बाह्ययंत्रणेद्वारे मनुष्यबळ उपलब्ध होण्यास अदयाप काही कालावधी लागणार आहे. त्याअनुषंगाने नियंत्रक, वैध मापन शास्त्र, मुंबई यांनी संदर्भ क्र. ३ येथील पत्रान्वये केलेल्या विनंतीनुसार त्यांच्या कार्यालयासाठी सद्यस्थितीत मे.क्रिष्णा मोटर्स प्रोव्हायडिंग मॅनपॉवर सर्व्हिस, जोगेश्वरी, मुंबई यांच्याकडून उपलब्ध झालेले ०२ वाहनचालकांच्या सेवेस मुदतवाढ देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय -:**

संदर्भ क्र. २ येथील शासन निर्णयान्वये दिलेल्या मान्यतेनुसार नियंत्रक, वैध मापन शास्त्र यांच्या आस्थापनेवर मे. क्रिष्णा मोटर्स प्रोव्हायडिंग मैनपॉवर सर्व्हिस, जोगेश्वरी, मुंबई या एजन्सीकडून बाह्ययंत्रणेद्वारे दोन वाहनचालकांच्या सेवा उपलब्ध करून देण्यासाठी करारनामा करण्यात आलेला असून सदर करारनाम्याची मुदत दिनांक २४/०५/२०२३ रोजी संपुष्टात आलेली आहे. यास्तव मे.क्रिष्णा मोटर्स प्रोव्हायडिंग मॅनपॉवर सर्व्हिस,

जोगेश्वरी, मुंबई यांच्याकडून घेण्यात आलेल्या दोन वाहनचालकांच्या सेवा दिनांक २५/०५/२०२३ पासून पुढे ३ महिने किंवा सुधारित धोरणानुसार बाह्ययंत्रणेमार्फत वाहनचालकांची पदे भरण्याची कार्यवाही पूर्ण होईपर्यत यापैकी कमी असेल त्या कालावधीसाठी मुदतवाढ देण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

०२. सदरचा शासन निर्णय हा वित्त विभाग क्र. विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/२०१३ विनियम, भाग-२, दिनांक १७/०४/२०१५ मधील, वित्तीय अधिकार नियम पुस्तिका-१९७८ भाग पहिला, उपविभाग-चार खर्चाच्या संकीर्ण बाबीमधील अ.क्र.११ अन्वये प्रशासकीय विभागास प्रदान करण्यात आलेल्या वित्तीय अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

०३. यासाठी होणारा खर्च मागणी क्र.एम-३, मुख्य लेखाशिर्ष ३४७५, इतर सर्वसाधारण आर्थिक सेवा (१०६) वजने व मापे यांचे विनियमन (००)(००)(०१) वजने व मापे विनियमन (नियंत्रक, उप नियंत्रक व सहायक नियंत्रक व वजने व मापे यांचे कार्यालय ) (अनिवार्य), (३४७५००९३)(१३) कार्यालयीन खर्च या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा.

सदरचा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०२३०६३०११४४५०६२०६ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकीत करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने .

SHESHRAO BHASKAR KUTE

Digitally signed by SHESHRAO BHASKAR KUTE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=FOOD CIVIL SUPPLIES AND CONSUMER PROTECTION DEPARTMENT, 2.5.4.20=b83dd3164bf1a6f2c48a39007e78789c79c52e07ad200c3250d381947c40582e, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=B9E0C912BDFBC8224F1554BA0BC93342824E4FAA118ED64C79AC40826E1611B3, cn=SHESHRAO BHASKAR KUTE
Date: 2023.06.30 11:45:57 +05'30'

**(शे.भा.कुटे)**
**कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. नियंत्रक, वैध मापन शास्त्र, महाराष्ट्र राज्य, मुंबई
२. महालेखापाल (लेखापरीक्षा) १, महाराष्ट्र, मुंबई
३. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) १, महाराष्ट्र, मुंबई
४. अधिदान व लेखाधिकारी, मुंबई
५. वित्तीय सल्लागार व उप सचिव, अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग, मुंबई
६. निवडनस्ती, कार्यासन ग्रा.सं.-३